# महाराष्ट्र शासन

**नस्ती क्र.अविवि-२०२२/प्र.क्र.२७/का.०७,**
अल्पसंख्याक विकास विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२,
दि. २२/०४/२०२२.

**विषय :- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK), हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**संदर्भ :-**

१. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.MsDP-१३/६२/२०२०-MsDP-MOMA, दि १२/०१/२०२१.
२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.MsDP-१३/७/२०२१-MsDP-MOMA, दि ०१/०२/२०२१.
३. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक, अविवि-२०२०/प्र.क्र.१९/का.७, दि.२२/०३/२०२१.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय यांचे पत्र.क्र.संआसे/कक्ष-३/टे.६/ अल्पसंख्याक निधी/२१, दि. १४/१२/२०२१.
५. सार्वजनिक आरोग्य विभाग, पत्र क्र.:प्रशामा २०२०/प्र.क्र.२०२/ आरोग्य-४, दि.०९/०९/२०२१.

**ज्ञापन:-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि. २८/१२/२०२० रोजी झालेल्या Empowered Committee च्या ३० व्या बैठकीत हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामाच्या रु.४२४३.६५ लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भाधिन क्र.(२) अन्वये कळविण्यात आले आहे. सदर प्रस्तावास केंद्र : राज्य हिश्श्याचे प्रमाण ६० : ४० असून यामधे केंद्र शासनाचा एकूण हिस्सा रु.२५४६.२ लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा रु.१६९७.५ लाख इतका आहे. सदर बांधकामाच्या प्रयोजनाकरीता दि.२२/०३/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिश्श्यातील रू.३१८.२७५/- लाख तर राज्य हिश्श्यातील रू.८४.८७ लाख असा मिळून एकूण रू.४०३.१४५/- लाख इतका निधी प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य संचालनालय, मुंबई यांना विहित अटिंच्या अधिन राहून वितरीत करण्यात आला आहे.

२. केंद्र शासनाने हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामास दिलेल्या मान्यतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

(रु. लाखात)

| अ.क्र | प्रकल्पाचे नाव | युनिटची संख्या | हिश्श्याचे प्रमाण | प्रती युनिट खर्च | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालयाचे बांधकाम करणेबाबत. | ०१ | ६० : ४० | ४२४३.६५ | २५४६.२ | १६९७.५ | ४२४३.७० |
| | **एकूण** | **०१** | **६०:४०** | ४२४३.६५ | २५४६.२ | १६९७.५ | ४२४३.७० |

केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन :-**

संचालक, आरोग्य संचालनालय यांनी सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामासाठी संदर्भ क्र. (३) अन्वये रू.४४७०.६२/- लाख इतक्या किंमतीचा प्रस्ताव सादर केला होता. तथापि केंद्र शासनाने सदर प्रस्तावास रु.४२४३.६५/- लाख इतक्या किंमतीच्या स्त्री रुग्णालय बांधकामाच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालयाचे बांधकाम करण्यासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" मध्ये दर्शविल्या प्रमाणे एकूण रु.४२४३.६५/- लाख इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

२. **अटी व शर्ती:-**

१. रुग्णालय बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी प्राप्त करुन घ्यावी.
२. रुग्णालय बांधकाम हे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने सविस्तर अंदाजपत्रकास दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार करण्यात यावे.
३. रुग्णालय बांधकाम करण्यासाठी आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी आणि यासाठी शासन निकषानुसार निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरुवात करावी व तसे शासनास अवगत करावे.
४. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
५. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करूनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
६. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामासाठी केंद्र + राज्य हिस्सा अनुक्रमे ६०:४० असा आहे. बांधकामासाठी प्राप्त होणाऱ्या केंद्र व राज्य हिश्यातील रकमेच्या विनियोगाबाबतची स्वतंत्र उपयोगिता प्रमाणपत्रे त्रैमासिक प्रगती अहवाल (QPR) विहीत नमुन्यात, अद्यावत छायाचित्रांसह शासनास सादर करावीत.
७. रुग्णालय बांधकामाच्या अंदाजपत्रकातील मुख्य इमारत बांधकामाव्यतिरिक्त "इतर अनुषंगीक बाबीच्या" अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.
८. रुग्णालय बांधकामासाठी दुसऱ्या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे (UC), त्रैमासिक प्रगती अहवाल (QPR), अद्यावत छायाचित्रांसह प्रस्तावासोबत शासनास सादर करावीत.
९. सदरचे काम नवीन नकाशाप्रमाणे करावयाचे असल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञा मार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामिण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्यचिकित्सक यांची राहिल. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवर जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

१०. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य / उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञाकडून या कामांच्या नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यकता नाही.

११. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत मिळणाऱ्या अनुदानातून पूर्ण केलेल्या कामाच्या ठिकाणी:- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (PMJVK) अल्पसंख्याक कार्य मंत्रालय भारत सरकार अशा आशयाचा फ़लक तसेच काम पूर्ण होण्यास लागणारा कालावधी , अंमल बजावणी करणाऱ्या संस्थेचे नाव, प्रस्तावित विकास कामास मान्यता मिळालेला दिनांक, काम पूर्ण होण्याचा दिनांक आणि प्रस्तावित विकास कामाचा अंदाजित खर्च इत्यादिंचा तपशील प्रस्तावित कामाच्या ठिकाणी ठळकपणे निदर्शनास येईल अशा पद्धतीने लावण्यात यावा.

१३. उपरोक्त काम सदर रक्कमेत पूर्ण होतील याची व सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची अवश्यकता लागणार नाही, याची विशेष दक्षता घेण्यात यावी.

३. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार हिंगोली, जि.हिंगोली येथील गट नं.९०, ९१, ९२ मध्ये १०० खाटांच्या नविन स्त्री रुग्णालय बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी प्रधानमंत्री जन विकास (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक **२०२२०४२२१५३९२४३५१४** असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

WILLIAM MANWEL DSOUZA

Digitally signed by WILLIAM MANWEL DSOUZA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7d736942a8f478e484a5c21abe75b8bbf7a0535119974e7126241c3ad35615c8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D34CF0DB7F8E9D72996DEDFB3A4E2F6FF7DE102B58FC5BBD5A639FC98C04820D, cn=WILLIAM MANWEL DSOUZA
Date: 2022.04.22 15:42:45 +05'30'

**(वि.म.डिसोजा)**

**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

<u>प्रत</u>

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२. प्रधान सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
३. आयुक्त, (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
६. जिल्हाधिकारी, हिंगोली.

७. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड.
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
९. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.
१०. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ, औरंगाबाद.
११. वैद्यकीय अधिक्षक, उप जिल्हा रुग्णालय, हिंगोली.
१२. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, हिंगोली.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. हिंगोली.
१४. जिल्हा शल्यचिकित्सक, हिंगोली.
१५. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.
१६. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१४/व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१७. नियोजन विभाग (कार्या.१४७५)

प्रपत्र 'अ'

**NAME OF WORK:- PROPOSED CONSTRUCTION OF 100 BEDDED WOMENS HOSPITAL ON GUT NO. 90, 91, 92,AT HINGOLI TQ. DIST. HINGOLI FOR NATIONAL HEALTH MISSION ( NHM )**

**AS PER MAHARASHTRA STATE PWD S. S. R.2021-2022 PUBLISHED ON 06-08-2021**

**RECAPITULATION SHEET**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **A** | **CIVIL AND SANITORY WORK** | | | |
| 1 | Dismentaling of Existing Building | --- | = | 3114747.00 |
| 2 | Cost of construction of 100 Bedded Women's Hospital Main Building, Elevation Treatement and Plantation work | --- | = | 257779658.00 |
| 3 | Entrance Gate, Security Cabin, Chain Link Fencing and Electric Panel Room | --- | = | 3442797.00 |
| 4 | UGWT, External Water Supply, External Drainage and Strom Water Gutter | --- | = | 8897272.00 |
| 5 | Internal B.T. Road, Paver Block and Culvert Work | --- | = | 5632591.00 |
| 6 | **TOTAL OF :- A** | --- | = | **278867065.00** |
| **B** | **SERVICES** | | | |
| 7 | Add For Gas Manifold Work On Sr. No.2 | 5.0% | = | 12888983.00 |
| 8 | Add For External Electrification Work On Sr. No.2 | 6.0% | = | 15466779.00 |
| 9 | Add For Internal Electrification Work On Sr. No.2 | 9.0% | = | 23200169.00 |
| 10 | Add For Fire Fighting System On Sr. No.2 | 4.0% | | 10311186.00 |
| 11 | Add For IT, CCTV, LAN, EPBAX, PA SystemWork On Sr. No.2 | 2.0% | | 5155593.00 |
| 12 | Add For Air Conditioning System ( HVAC ) Work On Sr. No.2 | 3% | = | 7733390.00 |
| 13 | For Furniture Work | Lumsum | | 7130000 |
| 14 | **TOTAL OF :- B** | | | **81886100.00** |
| 15 | **TOTAL OF :- ( A + B )** | --- | = | **360753165.00** |
| 16 | Add 12 % For G. S. T. On Sr. No. :- 15 | 12% | = | 43290380.00 |
| 17 | **TOTAL OF :- ( 15 + 16)** | | | **404043545.00** |
| 18 | Add 3% Contingencies on Sr. No. 15 | 3% | = | 10822595.00 |
| 19 | Add 1.99 % ForArchitectural Consultant Charges On Sr. No. :- 17 | 1.99% | = | 8040467.00 |
| 20 | Add 18.00 % G. S. T. On Architectural Consultant Charges Sr. No. :- 19 | 18% | = | 1447284.00 |
| 21 | **GRAND TOTAL :- ( 17 + 18 + 19 + 20 )** | --- | = | **424353891.00** |
| 22 | **SAY IN LAC** | --- | = | **4243.54** |